बुलढाणा जिल्हा कारागृह येथे शौचालये
बांधण्यासाठी येणा-या खर्चास व अंदाजपत्रके
व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००५/प्र.क्र.९१/पीआरएस-२**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक २७ एप्रिल, २००५.**

वाचा:- उप अभियंता कारागृह महानिरीक्षकणालय यांचे पत्र क्र.बीएलडी/बुजिका/अ.शौ./२००५/३३८५/कक्ष-३, दि.२८.३.२००५.

**<u>शासन निर्णय</u>** :- बुलढाणा जिल्हा कारागृह येथे शौचालये बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात असे नमूद करण्यात येते की, मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल आलेल्या याचिका क्र.३८६/२००४ प्रकरणी मा.न्यायालयाने कारागृहातील बंद्यांच्या अधिकृत क्षमतेपेक्षा जादा बंदी संख्येनुसार स्वच्छताविषयक बाबी परिपूर्ण असाव्यात असे निर्देश दिलेले असून कारागृह नियमावलीत विनिर्दिष्ट केल्यानुसार प्रत्येक कारागृहाच्या बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व कारागृहात बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधावी लागणार आहेत. त्या अनुषंगाने बुलढाणा जिल्हा कारागृह येथे २४ अतिरिक्त शौचालये बांधणे आवश्यक असल्यामुळे कारागृह महानिरीक्षणालयाने उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये सदर २४ शौचालये बांधण्यासाठी लागणा-या रु.४,२३,०००/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव व अंदाजपत्रक आणि नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहेत.

२. उपरोक्त परिस्थितीत सदर बाब न्यायालयाच्या अधिन असल्याने त्याची प्राधान्याने पूर्तता करणे आवश्यक आहे. तसेच यामुळे बंद्यांच्या सोयीसुविधेत होणारी वाढ व कारागृहातील स्वच्छता इत्यादी बाबींचा विचार करुन बुलढाणा जिल्हा कारागृह येथे बंद्याकरीता उपरोक्त परिच्छेदात नमूद केल्याप्रमाणे एकुण २४ शौचालये बांधण्यासाठी शासनास सादर करण्यात आलेल्या खर्चाच्या प्रस्तावातील रु.४,२३,०००/- (रुपये चार लाख तेवीस हजार फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके आणि नकाशास शासन या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, मुख्य लेखाशिर्ष "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ९०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना प्रमुख बांधकामे (००) (१०) तुरुंग (४०५९-०११७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर

अनुदानातून भागविण्यात यावा. सदर बांधकामास प्रत्यक्ष निधी उपलब्ध झाल्यानंतरच सुरुवात करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्टामधील अनु.क्र.१ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( आ. म. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रत,
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर.
अधिक्षक, बुलढाणा जिल्हा कारागृह, बुलढाणा.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
उपविभागीय अभियंता (वर्ग-१) सार्वजनिक बांधकाम विभाग, उप विभाग, बुलढाणा.
श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
अवर सचिव,बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२